# उपयुक्त चमत्कारसंग्रह

किंवा

अप्रसिद्ध व उपयुक्त अशा नाना प्रकारच्या चमत्कारिक युक्ति, व औषधें यांचा संग्रह.

## भाग. ८ वा.

हें पुस्तक,

गंगाधर गोविंद सापकर यांचे छापखान्याचे मालक भाऊ गोविंद सापकर यांनी लोकपरिज्ञानार्थ तयार करून;

पुणें पेठ बुधवार येथें

आपले 'ज्ञानचक्षु' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

आवृत्ती १ ली.

तारीख २५ डिसेंबर सन १८७९ इसवी.

किंमत ८ आणे.

# प्रस्तावना.

पूर्वापार कोणतीही विद्या, मंत्रसाधनें वगैरे विषयांची गुप्त ठेवण्यांत मोठी मातबरी समजून तो गुण जितका लोकांच्या समजुतीस न येईल तितका राखण्याची चाल पडून गेली आहे, ह्मणोन अनेक प्रकारचे हुंनर, औषधी, ढोंगधत्तुरे यांचें वास्तविक ज्ञान, कृति, स्थीति व त्यापासून फायदे यांची वाढ न होतां त्यांचें ज्या इसमास ज्ञान होतें त्यांजबरोबरच त्या गुणांचा बहुतकरून लय होत गेला; याचकारणानें ह्या देशांत जसे विद्यादि गुणांपासून फायदे व्हावे तसे न होतां उलट नुकसान होऊन ही निकृष्ट स्थीति प्राप्त झाली आहे तिचें पुनरुद्धर्चन होण्यास मुख्यत्वें विद्या वृद्धी हें साधन झालें आहे, त्यायोगानें अनेक प्रकारचे गैबीएल्म उघडकीस आणण्याचीं द्वारें खुलीं झाल्यासारखीं आहेत. त्यांतच हेंही उपयुक्त चमत्कार संग्रह पुस्तक गणलें जावें ह्मणोन आह्मी प्रार्थना करितों.

**आठवे भागाची सूचना:**—आमचे ह्या पुस्तकाचा पहिला, दुसरा, तिसरा, चवथा, पांचवा, सहावा व सातवा ह्या भागांस बराच सूज्ञ व गुणग्राहक लोकांनीं आश्रय दिला, त्याप्रमाणेंच ह्या भागास देतील अशी अशा आहे. यांत दोष बहुत असतीलच त्या दोषांचा अव्हेर करून जे थोडे बहुत गुण आढळतील तेच ग्रहण करावे.

# अनुक्रमणिका.

# उपयुक्त चमत्कारसंग्रह.

## भाग ८ वा.

### कपड्यास निरनिराळे रंग करण्याची कृति.

सलफ्यूरिक आसिड (आगपाणी) व साधेंपाणी एकत्र करावें. व कारबोनेट आफ पोटाश पाण्यांत विरवून पूर्वींचे पाण्या इतकेंच पाणी घ्यावें व हें दोन्ही प्रकारचें पाणी सारखे भाग घेऊन एकत्र करावें. हें मेलन तयार झालें ह्मणजे एक स्वच्छ कपडा त्यात भिजवावा ह्मणजे कपड्याचा रंग निळा होतो. पिवळा कपडा भिजविला असतां हिरवा होतो. त्याच प्रमाणें तांबडा असल्यास जांभळा व जांभळा असल्यास तांबडा होतो.

बिटरूट झाडाचे मुळ्यांचा रस काढावा व त्यांत थोडेसें चुन्याचें पाणी घालावें. पूर्वींचे रसाचा रंग तांबडा असतो परंतु चुन्याचें पाणी त्यांत घातल्या बरोबर रंग नाहींसा होतो व मिश्रणास रंग मुदलींच नाहींसा दिसतो. यांत पांढरा कपडा भिजवावा व जलद वाळवावा ह्मणजे कांहीं तासानीं कपड्याचा रंग तांबडा होतो.

## अमृततुल्य पदार्थ.

नायट्रेट आफ सिल्व्हर ह्मणून एक पदार्थ चांदी व सोन्याचा अर्क मिळून झालेला असतो. हा पदार्थ थोडासा घेऊन त्यांत हैपोसल्फेट आफ सोडा मिळविला असतां अमृत तुल्य एक गोड पदार्थ होतो. हे दोन्हीही पदार्थ मुळचे फार कडू आहेत तरी त्यांचें मेलन झालेकीं त्यांचा कडूपणा जातो.

---

## अदृश्य अक्षरें किंवा खुणा दृश्य करण्याची युक्ति.

एका कांचेवर फ्रेंच खडूनें लिहावें व लिहिलेला मजकूर रुमालानें पुसून टाकावा. ह्मणजे दिसत नाहींसा होईल. तोच मजकूर पुनः दृश्य करणें असल्यास त्याजवर तोंडाची-वाफ टाकावी ह्मणजे पुनः दृश्य होईल.

---

## कपड्यानें पेट न घेण्याची युक्ति.

कपडे लिनन वगैरे पदार्थ लवकर पेट घेतात. हेच न पेट घेण्यासारखे करणें असल्यास टांकणखाराचे पाण्यांत भिजवून वाळवावे. ह्मणजे लवकर पेट घेत नाहींत.

---

## एखादे मेलनास पाण्यानें आग लावणे.

एका कांचेच्या पेल्यांत थेडसें आगपाणी ओतावें व त्या- वर सोडियम धातूचा लाहनसा तुकडा टाकावा. हा तुकडा त्या आगपाण्यावर तरंगतो. परंतु पाण्याचा एक थेंब जर टाकला तर तावडतोब पेट घेतो

---

## पाण्यांत अग्नीच्या लाटा दिसणे.

फॉसफ्युरेटेडएथर ह्मणून एक पातळ पदार्थ असतो. तो घेऊन एका स्वच्छ साखरेचे खड्यावर त्यांतील पांच चार थेंब टाकावे. व ती साठवून पाण्यानें भरलेल्या ग्लासांत घालावी ह्मणजे पाण्याचे वरील भागास आग लागल्या सारखी दिसते. यावरच तोंडानें हलके वारा घालावा ह्मणजे पाण्यावर विस्तवाच्या लाटा चालल्या आहेतसें दिसतें.

---

## शिशाचे बरोबर पोलादाचा रस करण्याची युक्ति.

पोलाद विस्तवांत घालून प्रथम लाल करावें मग तें एका चिमट्यानें धरून त्याचेवर गंधक फिरवावा. अशी कृति होतांच पोलादाचा रस होतो.

# पटकीवर औषध.

| | | | |
|---|---|---|---|
| अफू.... .... .... | ग्रेन १. | पेपरमीठ तेलाचे थेंब | २ |
| मिरच्यांची वस्त्रगाळ पूड | ग्रेन १. | हिंग ग्रेन.... .... | $\frac{1}{2}$. |
| क्यालोमेल .... .... | ग्रेन १. | गव्हाचें पीठ .... | २. |
| कापूर.... .... .... | ग्रेन $\frac{1}{2}$. | स्वच्छ पाणी गोळया. | |
| काताची पूड.... .... | ग्रेन १. | बांधण्यापुरतें. | |

या जिनसा एकत्र करून त्याच्या दोन गोळया कराव्या व ह्याच प्रमाणानें जितक्या पाहिजे असतील तितक्या जास्त कराव्या.

## औषध देण्याची रीति.

जुलाब होण्यास आरंभ झाल्यावर पुरुष अगर स्त्री तरुण असल्यास प्रत्येक वेळीं एक एक गोळी अर्ध अर्ध तासानें द्यावी. पांच पासून दहावर्षां पावेतों वयाच्या मुलांस प्रत्येक वेळीं अर्धी गोळी द्यावी. रोग्यास एक दोन जुलाब झाल्याबरोबर लागल्याच ह्या गोळया देण्यास आरंभ करावा.

वांति होत असली तर खालील औषध द्यावें.

क्रिआसोट थेंब १, साखर ग्रेन ५, शुद्ध पाणी औंस १। ह्या जिनसा एकत्र करून वांति झाल्याबरोबर देत जाव्या दर एक वेळेस वर लिहिल्या प्रमाणें तिन्ही जिनसा घेऊन औषध

तयार करावें आणि रोग्याचें वय व शक्ती असेल त्याप्रमाणें देत जावें ह्मणजे वांति बद होईल.

---

## ल्हान शांत होणें व पोट न फुगणे ह्यावर.

वावडिंग व वायकुमा समभाग घेऊन त्यांची वस्त्रगाळ पूड करून ती शुद्ध पाण्यांत घालून जरा ऊन करून पिण्या सारखें झालें ह्मणजे द्यावें ह्यापासून पोट फुगणार नाहीं, व तहान शांत होईल.

हायड्रेट क्लोरल इंजक्शन ( हायपोडर्मिक उपयोगा करितां)
हायड्रेट क्लोरल ग्रेन ५ पाणी थेंब ६०.

हे दोन पदार्थ एकत्र करून पिचकारीच्या द्वारें भुजावर किंवा पोटऱ्यावर २।२ तासांनीं कातडीच्या आंत मारावें. रोग्याची स्थिती असेल त्या प्रमाणें ६ पासून ३० पर्यंत मारावें. ह्या रोगापासून पायांस वगैरे ठिकाणीं पेटके येतात त्याजवरही त्या पिचकारीचा फार उपयोग आहे.

---

## हिंगुळ करण्याची कृति.

गंधक १५ भाग व पारा ९५ भाग हे दोन पदार्थ घेऊन ते एकत्र करावेत, व त्या मिश्रणास साधारण उष्णता

खावी ह्मणजे त्याचा एक काळा पदार्थ तयार होतो. त्यास गंधक युक्त पारा, ज्यास इंग्रजींत सल्फ्यरेट आफ् मर्क्यूरी असें ह्मणतात, याचें मिश्रण असतें तें ऊन करून त्याची चूर्ण रूप वाफ धरली ह्मणजे गंधक आणि इतर तत्वांचा संयोगी पदार्थ ज्याला सल्फ्युरेट ह्मणतात तो शुद्ध झालेला पदार्थ सांपडतो. तो पाण्यांत घालून बारीक खलून तयार केला ह्मणजे साधारण प्रतीचा हिंगुळ तयार झाला.

---

## कृतीचे मासे.

बसल्याजागीं एखाद्या तांब्यांत अगर पातेल्यांत मासे उत्पन्न करून चमत्कार दाखविणे असेल तर ही पुढें लिहिलेली युक्ति चांगली आहे. नदींतील माशांचीं अंडीं आणून उन्हांत वाळवावीं. तीं वाळल्या नंतर, कोळशाचे वस्त्रगाळ पुडींत मिसळून ठेवावींत ज्या वेळेस चमत्कार दाखवावयाचा असेल त्या वेळेस त्यांतील थोडीशी पूड घेऊन पाण्यांत टाकावी ह्मणजे मासे तयार होऊन इकडे तिकडे पोहूं लागतील. असा कित्येक शोधक लोकांचा तर्क आहे तो खरा किंवा खोटा याचा अनुभव पहाणें असेल तर पहावा.

---

## नेत्ररोग दूर होण्याचे उपाय.

भोजन झाल्या नंतर ओले हात असतांच, तळवे एकाशीं एक घासून डोळ्यांस लावावे. तेणें करून नेत्रांस उत्पन्न झालेले रोग व तिमीर रोग दूर होतात. त्याच प्रमाणें प्रतिदिवशीं तीनवेळ थंड पाण्यानें चूळ भरून दुसरें थंड पाण्यानें डोळे तीनवेळ शिंपावे तेणें करून अति दुःख देणारे नेत्ररोग कधीं होत नाहींत.



## तपकीर करण्याची कृति.

दडस पत्याचा व तांबड्या रंगाचा तंबाखू घेऊन उन्हांत वाळवावा तो कडकडीत झाला ह्मणजे चूरून त्यांतील काड्या काढून टाकाव्या नंतर बारीक वस्त्रांत घालून जमिनीवर आपटावा ह्मणजे त्यांतील माती निघून जाईल. याप्रमाणें केरकचरा जाऊन तंबाखू स्वच्छ झाल्यावर तो पाण्यांत भिजवावा- नंतर तो पळसाच्या वाळलेले पानांत आवळून बांधावा व तीन दिवस पर्यंत निवांत जागेंत आंवत ठेवावा. पळसाच्या पानांत न बांधितां मडक्यांत दडपून भरून ठेविला तरी चालेल. नंतर चवथ्या दिवशीं बाहेर काढून माती न लागे अशा ठिकाणीं दोन घटका बळकट मळावा नंतर पर्वत

मडक्यांत भरून दादरा बांधून तसाच ठेवावा. चार पांच दिवसांनीं बाहेर काढून तसा ओलाच कुंड्यांत घालून मुसळानें घोटून घोटून वाळवावा; ह्मणजे तपकीर तयार होईल. ती घट्ट वस्त्रानें गाळून, लाखलोट्याचे आंतलें आंग, १ तोळा लिंबाचा रस व ३ मासे मध एकत्र करून सारवावें व त्यांत दडपून भरून ठेवावी. अशा रीतीनें त्या मडक्यांत ती तपकीर १५ दिवस राहिली ह्मणजे मुरून उत्कृष्ट तयार होते. सुवासीक तपकीर तयार करणें झाल्यास याच तपकीरीस गुलाबी अत्तराचा वास लाविला ह्मणजे गुलाबी तपकीर तयार होते. कस्तुरीची पुडी त्यांत टाकून ठेविल्यास कस्तुरीचाही वास त्या तपकीरीस लागेल.

---

# पोटाशिअम,

पोटाशिअम या नांवाची एक पांढऱ्या रंगाची धातु आहे. ही धातु इतकी नरम असते कीं ती चाकूनें सहज कापिली जाते. ह्या धातूचे अंगीं पाण्यावर तरंगण्याचाही गुण आहे. ह्या धातूच्या योगानें विलक्षण चमत्कार दृष्टीस पडतात ते असे.

एक कोराकागद घेऊन त्यावर पाण्याच्या रेघा काढाव्या; आणि चाकूनें या धातूचा एक हरभऱ्या एवढा तुकडा कापून तो

त्या ओढलेल्या रेघा पैकीं एका रेघेवर ठेवावा. ह्मणजे तो त्या रेघेवरून आपोआप चालूं लागतो. व जसजसा तो चालत जातो तसा तसा जळत ही जातो. येणें करून मोठा चमत्कार दृष्टीस पडतो.

गंधकांत या धातूचा अंश असतो ह्मणून गंधक हा पदार्थ विशेष ज्वालाग्राही आहे.

पदार्थांस कृतीनें निरनिराळे रंग देतात ते सर्व कित्येक धातूचे मिश्रणा पासून झालेले असतात. हें खालीं लिहिलेल्या कृतिवरून ध्यानांत येईल.

---

## निळ्यारंगाची कृति.

सल्फेट ऑफ आयर्न (लोखंड व गंधक यांचें मिश्रण) घेऊन त्याचें पाणीं तयार करावें. या पाण्यांत प्रशियेट ऑफ पोटाश याचे दोन तीन थेंब टाकतांच उत्तम निळा रंग तयार होतो.

---

## उदीरंगाची कृति,

सलफेट आफ आयर्नचे जागीं सलफेट आफ कापर (तां-

ड्याचें व गंधकाचे मिश्रण) याचा उपयोग केल्यास वरचे कृतीनें उत्तम उदीरंग तयार होतो.

---

## निळयारंगाची दुसरी कृति.

सल्फेट आफ कापरचे थोडें पाणी घेऊन त्यांत अमोनियाचे पाण्याचे पांच चार थेंब पाडवावे ह्मणजे एक घन पदार्थ तळीं बसतो. याचा रंग निळा असतो. यांतच आणखी आमोनियाचे चार पांच थेंब पाडविले असतां ताबडतोब निळे रंगाचें स्वच्छ पाणी तयार होतें.

---

## शाईसारखा रंग तयार करण्याची युक्ति.

सल्फेट ऑफ आयर्नचे पाण्यांत हिरड्याचे पाण्याचे चार पांच थेंब घातल्या बरोबर शाईसारखा रंग तयार होतो. हिरड्याचे पाण्याचे ऐवजीं चहाचे पाण्याचे चार पांच थेंब पाडविले तरी चालेल.

---

## जर्दारंग करण्याची कृति,

एक साधारण मोठी कांचेची नळी घ्यावी त्यांत दाणेदार जस्ताचे दोन तीन तुकडे टाकावे व आजमासें पाऊणनळी

भरेल इतकें स्वच्छ पाणी घालावें नंतर आयोडाईनचे दोन तीन दाणे त्यांत टाकिले असतां जांभळा रंग दिसूं लागतो. हा रंग हलके हलके नाहींसा होतो असे प्रकारें हा रंग नाहींसा झाला म्हणजे त्यांत आणखी थोडेंसें आयोडाईन घालावें इतकें झाल्यावर तयार केलेले पाण्यांत करोसिव्हसब्लीमेटचे दोन तीन थेंब टाकावे म्हणजे उत्तम जर्दरंगाची बुकणी तळाशीं बसेल.

---

## निळयारंगाचा पातळ पदार्थ असल्यास त्यास पांढरें रंगाचा करण्याची कृति.

आगपाण्यांत एक लहानसा निळेचा तुकडा विरवावा म्हणजे उत्तम निळा रंग होतो. एक पाइन्टभर पाणी घेऊन त्या पाण्यांत या केलेले निळे रंगाचा एक थेंब टाकल्यास तो पाण्यांत अगदीं मिळून जाईल. मग त्यांतील थोडेंसें पाणी क्लोराइड आफ लाईममध्यें घातल्यास निळा रंग अगदीं नाहींसा होईल.

या कृतीनें कपड्याची नीळ घालवितां येते.

---

## दोन पातळ पदार्थांच्या मिश्रणानें एक घन पदार्थ तयार करणें.

थोडेंसें पाणी घेऊन त्यांत विरेल इतका म्युरिएट ऑफ़ लाईम विरवावा. त्या पाण्या इतकेंच सलफ्युरिक आसीड घ्यावें. व त्या दोहोंचें हलवून हलवून मिश्रण करावें. असें केल्यानें ताबडतोब एक घन पदार्थ तयार होतो.

## दोन पातळ व थंड पदार्थ एकत्र केले असतां त्यापासून एक पातळ व उष्ण पदार्थ उत्पन्न होणें.

सलफ्युरिक आसीड ४ भाग व स्वच्छ पाणी एक भाग घेऊन एकदम एका पेल्यांत ओतावें ह्मणजे तें मिश्रण अगदीं कढत होतें.

---

## बुकावरील शाईचा डाग काढण्यास उपाय.

साइट्रीक आसीड किंवा टारटारिक आसीड हे दोन पदार्थ थोडथोडे पाण्यांत घालून, तें पाणी, ज्या बुकावर शाईचा डाग पडला असेल त्या ठिकाणीं बोळ्यानें फिरवावें असें केलें

असतां कागदा वरील छापील मजकुरास कांहीं इजा न होतां फक्त शाईचा डाग चांगला निघतो.

---

## मनुष्यास दमा होतो तो जाण्यास उपाय.

उत्तम मद दोन औंस ह्मणजे पांच तोळे व एरंडेल तेल एक औंस ह्मणजे अडीच तोळे हे दोन पदार्थ एकत्र करून त्यांचें मिश्रण सकाळीं व सायंकाळीं दोन्ही वेळां एकेक चमचा घेऊन सेवन करावें ह्मणजे दमा नाहींसा होतो.

---

## कापडास कसर न लागण्याचा उत्तम उपाय.

एप्रिल किंवा मे ह्मणजे चैत्र वैशाखाचे सुमारास कपडे वेताच्या किंवा दुसऱ्या कोणत्याही लवचीक काठीनें झटकावे. नंतर त्यांच्या घड्या करून व त्या घड्यांत थोडथोडा कापूर घालून तागाच्या कपड्यांत गुंडाळून बांधून ठेवाव्या. आपणास ज्या वेळेस कपडे वापरण्याचें कारण पडेल त्या वेळेस सोडून पुन: पूर्वीप्रमाणें काठीनें झटकावे, व २४ तास पर्यंत हवेंत खुले ठेवावे ह्मणजे कापराचा वास जाईल व कपड्यास कसर लागणार नाहीं. जर कपड्याची लोकर जाड असेल

तर घडी करते वेळेस कापरामध्यें तितकीच काळे मिऱ्याची पूड टाकावी ह्मणजे कसर लागणार नाहीं.

---

## पिवळी शाई करण्याची युक्ति.

म्यूरेट ऑफ कॉपर ह्याचें पाणी करून त्या पाण्यानें कागदावर लिहिलें असतां ती अक्षरें वाळल्यावर दिसणार नाहींत परंतु तोच कागद विस्तवा जवळ नेऊन किंचीत ऊन केला असतां उत्तम पिवळे रंगाचीं अक्षरें दिसतील.

---

## हिरवी शाई करण्याची युक्ति.

म्युरियट ऑफ कोबाल्ट ह्याचे पाण्यानें लिहून वरील पिवळे रंगाचे शाईची कृति करावी ह्मणजे उत्तम हिरवी शाई आहे असें दिसेल.

---

## निळी शाई करण्याची कृति.

आशीटेट आफ कोबाल्ट किंवा म्युरीएट आफ कोबाल्ट ह्या पदार्थांतून लोखंडाचें मिश्रण काढावें व बाकी राहिलेले मिश्रणानें लिहून पिवळे शाईची कृति करावी ह्मणजे निळ्या शाईनें लिहिल्या सारिखें दिसतें.

## वीज आंगावर न येण्यास उपाय.

कोणीही मनुष्य रानांत असेल तर त्यानें झाडाखालीं उभे राहूं नये. परंतु विनधोक पावसामध्यें फिरावें ह्मणजे आंगावर वीज येणार नाहीं. कारण झाडाचे विजेला अकर्षण आहे.

कोणत्याही धातूच्या पदार्था शेजारीं उभें राहूं नये. पाण्याच्या नळ्या व आगगाडीचे रेल किंवा तारायंत्राचे खांब वगैरे ठिकाणीं सहसा उभें राहूं नये. त्याच प्रमाणें मनुष्य घरांत असतां त्यानें खोलीच्या मध्यभागीं बसावें कोणतेही कोपऱ्याचे बाजूस अगर भिंतीस लागून बसूं नये.

---

## कोणत्याही झाडावरील किडयांचा नाश करण्यास उपाय,

तारेच्या फडक्यामध्यें गंधकाचें फूल बांधावें व त्याची पूड झाडावर लावावी. ह्मणजे झाडाचे किडे नाहींशे होतात.

---

## तांबें रुप्या प्रमाणें करण्याची युक्ति.

अर्धाशेर तांब्यामध्यें सुमारें दोन तोळे कथील मिसळून एकत्र केल्यास तें तांबें रुप्या प्रमाणें दिसतें व त्याचा नादही रुप्या प्रमाणें होतो,

## कांचेचे गोळ्यास आंतून कल्हई करण्याची युक्ति.

कथील एक भाग, शिसें एक भाग, बिस्मथ एक भाग हे पदार्थ एकत्र करून पातळ करावे नंतर त्यामध्यें तीन भाग पारा टाकावा. व हें मिश्रण गोळ्यामध्यें ओतून तो गोळा चोंहीकडे फिरवावा; ह्मणजे कल्हई होते.

---

## तांब्याचें सोनें करण्याची युक्ति.

शंभर भाग तांबें व चौपन भाग जस्त एके ठिकाणीं मिश्रीत केलें असतां सोन्या सारखी धातु तयार होते.

---

## कंबर दुखत असेल त्यास, ग्रध्रास व वायूस उत्तम औषध.

दुधांत एरंडाच्या बिया शुद्ध करून त्यांचें पीठ शिजवावें व ती खीर करून घ्यावी.

---

## लघवी परीक्षा.

कफ, पित्त, वात आणि संनिपात ह्मणजे तिन्ही मिश्र झाले.

ल्या अनुक्रमें करून पांढरें, पिवळें, तांबडें व काळें याप्रमाणें लघवीस होतें.

## ओकारी होण्यास स्वल्प उपाय.

शुद्ध केलेलें मोरचूत गुलाबा बरोबर घ्यावें आणि वरचेवर ऊन पाणी प्यावें ह्मणजे ओकारी होते. अगर सैंधव, पिंपळी आणि गेळफळ यांचा काढा करून प्यावा ह्मणजे ओकारी होते.

---

## संनिपात ज्वर लक्षण.

बडबड, अतिलाल ओढलेले स्त्रावयुक्त डोळे, शब्द नेहमीं गळ्यांत, क्षणानें थंडी, घटकेनें दाहा, संधीहाडें यांचे जागीं पिडा, पोट अत्यंत जड होणें, डोकें जड, तृषा लागणें, निद्रा न लागणें, कानांत शब्द होणें, कृशता, भोंड, अरूची, मोह, श्वास, खोकला, इतकीं लक्षणें असल्यास संनिपात ज्वर जाणावा.

## घाम बंद होण्यास उपाय.

मिरें, वेखंड, ओवा हरभरे भाजलेले, इतक्या. पदार्थांचें चूर्ण करून आंगास लाविलें असतां घाम बंद होतो.

---

## संनिपात ज्वरांत जिभेस कांटा आला किंवा फुटली तर त्यास उपाय.

मधांत मनुका खलून जिभेला चोळाव्या ह्मणजे जीभ बरी होते.

---

## बाळंतरोग समजण्याचीं चिन्हें.

बाळंतिणीस अतिसार, शूल, सुज, आंगजडपडणे, तहान लागणे, कंपहोणे, ज्वरयेणे, आंममोडूनयेणे हीं सूतिका रोगाचीं लक्षणें समजावीं.

---

## वैद्यबवास रोग्याकडे जातांना शुभशकुन कोणते.

डावे बाजूनें पुरुष गेला असतां चांगला. हत्ती आणि खेचर दोन्ही खेरीज करून स्त्री उजवे बाजूनें गेली असतां चांगली. ह्मैस व कोल्हे जाऊं नये.

## पंडुरोग समजण्याचीं लक्षणें.

प्रहतीवाटे रक्त पडणे, शक्ती क्षीण, आहारकमी, निस्तेज, बळकमी, गूद, बेंबी, पाद, गुह्य, चक्षु, भिवया, इतक्या ठि-काणीं सूज, हीं पंडु रोगाचीं लक्षणें जाणावीं.

---

## कापराचें तेल करण्याची कृति.

कापराची पूड अडीच तोळे व खोबऱ्याचें तेल अर्धाशेर घ्यावें नंतर ती कापराची पूड एका बाटलींत घालावी, व तें तेल कडकडीत ऊन करून त्या बाटलींत ओतावें. आणि कापराची पूड वितळे पर्यंत बाटली घुसळावी ह्मणजे कापराचें तेल तयार होतें.

---

## चिनई भांडें फुटलें असतां जडण्याची कृति,

कळीचा चुना एक भाग, कोंबडीचे अंड्यांतील पांढरा मगज दोन भाग हे दोन पदार्थ एकत्र करून फुटले ठिकाणीं लावावे. व तें भांडें उन्हांत ठेवावें तें वाळलें ह्मणजे पूर्वी प्रमाणें जडून तयार होतें.

## विस्तव खाण्याची व हातीं धरण्याची युक्ति,

पाण्यानें मिश्रीत सलफ्युरिक आसीड तीन भाग स्याल आमोनिक एक भाग, कांद्याचा रस दोन भाग, ज्या शरीराचे भागास विस्तव लागण्याचा असेल तो भाग या मिश्रणानें वारंवार धूत जावा. ह्मणजे विस्तवानें त्या भागास इजा होणार नाहीं.

---

## शरीरास अरोग्य असण्यास उपाय व त्याजविषयीं नियम,

पाहांटेस उठावें व रात्रीं फार जागूं नये. दररोज सकाळीं थंड पाण्यानें स्नान करावें. आंग चांगलें कोरडें पुसावें. मद्य प्राशन करूं नये हवाशीर जागेंत निजावें. कधीं कधीं डोकें गरम झाल्यास त्याजवर थंड पाण्याची पट्टी थंड होण्या करितां ठेवीत जावी. पाय नेहमीं गरम ठेवावे आहार नियमीत ठेवावा. याप्रमाणें वर्तन केल्यास शरीरास अरोग्य राहातें.

---

## दांत चांगले रहाण्यास उपाय,

गलाबाचे पाणी दीडशेर, टारटरिक आसिड तोळ पांच, भाजलेली तुरटी एक स्कुपल, हे पदार्थ एकत्र करून स्पंजाचे तुकड्याने दांत घासले असतां चांगले राहातात. व त्यास कांहीं दुखापत होत नाहीं.

---

## गमतीचा दिवा,

एका लांब रुंद तोंडाच्या बाटली मध्यें एका वाटाण्या एवढा फासफरसचा तुकडा टाकावा. आणि त्याजवर कडकडीत तेल ओतावें, तें सुमार बाटलीचा तिसरा हिस्सा भरे पर्यंत ओतावें. नंतर बाटलीस घट्ट बूच मारावा. व ज्या वेळेस आपणास उ[illegible] काचेचा तो बूच उघडावा व पुन्ह [illegible] म्हणजे [illegible] दिव्याचे उजडा प्रमाणें बाटलीचा प्रकाश पडतो व याच बाटलीच्या प्रकाशाने खिशांतील लहान घड्याळाचे आकडे ओळखतां येतात. व आपणास पु[illegible] उजेडाचा उपयोग करावयाचा असल्यास बाटलीचा बूच उघडावा म्हणजे पूर्वील प्रमाणे होते.

## कितीही मोठा वारा आला असतां न विझणारी मेणबत्ती,

एका तागाचे फडक्यावर बारीक मिठाची पूड टाकावी. आणि तें फडकें मेणबत्ती भोंवतीं गुंडाळावें. ही मेणबत्ती कोणत्याही मोठ्या वाऱ्याचे तुफानावर ठेविली असतां विझली जाणार नाहीं.

---

## लोखंड रुप्याप्रमाणें करण्याची कृति.

मराईन आसीडमध्यें कांहीं पारा विरघळून त्यामध्यें लोखं-डाचा तुकडा टाकावा, किंवा तें लोखंडावर घासावें ह्मणजे रुप्याप्रमाणें पांढरें लोखंड दिसतें.

---

## हस्तीदंत अगर शिंगें यांस हिरवा रंग देण्याची कृति.

ज्या पदार्थास रंग देणें असेल तो पदार्थ तुरटीचे पाण्या-मध्यें उकडावा. नंतर तांब्याचे कळंकाची बारीक पूड क-रून, त्या पुडींत साल्ट आमोनिक घालावें नंतर उत्तम व्हि-नीगरमध्यें तो पदार्थ टाकावा त्यास हिरवा रंग येतो.

## आसीड वगैरे तेजाफानें आंग भाजलें असल्यास तें बरें होण्यास उपाय.

आसीड वगैरे तेजाफानें आंग भाजलें असल्यास कोंबडी-च्या अंड्यांतला पांढरा मगज काढून त्यांत खडूची पूड घाला-वी, आणि तें मिश्रण भाजले ठिकाणीं लावावें. ह्मणजे ता-बडतोब गुण येतो.

---

## हवेच्या योगानें बाटली फुटण्याची युक्ति.

साधारण चौरस आकृतीची पातळ बाटली एअर पंपाच्या तोंडावर ठेवून, तींतील सर्व हवा खलास झाल्यानंतर एक मोठा आवाज होऊन बाटली आपोआप फुटते. त्याचप्र-माणें बाटली हवेनें भरली असल्यास तीजवर घट्ट बूच मारावा. नंतर एअर पंपानें त्या बाटली सभोंवतील हवा नाहींशी झा-ल्यावर मोठा अवाज होऊन बाटली फुटते.

---

## कृत्रीम धरणीकंप आणि ज्वालामुखी.

नव्या लोखंडाचे बारीक तुकडे आणि शुद्ध गंधक हे पदार्थ कुटून बमगाळ पूड करावी. व त्याला ओलसर जागा-ची लागूं देऊं नये. नंतर तें सुमारें पंधरा शेर वजनाचें

मिश्रण, जमिनीखालीं एक फूट खणून यामध्यें पुरावें. आणि सुमारें आठ तासाचे आंतच ती जमीन हालूं लागेल आणि थोडक्याच वेळानें आंतून ज्वाळा व धूर येऊं लागेल. असें झाल्यानें धरणीकंप होतो व ज्वालाही निघतात,

---

## दूध न आंवतां जसेंच्या तसें बहुत दिवस राहाण्यास उपाय.

अर्ध शेर दुधांत राईचे तेलाचे १२ थेंब टाकले असतां तें दूध आंबट न होतां, १५ दिवस जसेंच्या तसें गोड राहतें.

## नवीन शोध.

आतां असें कळून येतें कीं, फक्त कापसाचेच तंतू रुपांतर झाल्यास जड होतात असें नाहीं परंतु रेशीमही तसेंच होतें. रेशीम कांहीं क्षारांत भिजविलें असतां दुप्पट किंबहुना चौपट जड होतें. व क्षारांत भिजविल्यावर रेशमाचे अंगीं ज्वाला ग्रहण करण्याचाही गुण येतो. व तें अशा स्थितीमध्यें कधीं आपोआपही पेटतें.

---

## गाईचे दुधापासून उत्पन्न होणारी पोटशुळाची व्यथा.

एका डाक्टराचें मत असें आहे कीं ज्या गाईस वाईट प्रकारें वागविलें जातें ह्मणजे जिचे खाण्या पिण्याची नीट व्यवस्था केली नसते तिचें दूध प्यालें असतां, पोटशूळ व त्वच्याजन्यरोग उत्पन्न होतो. व धमन्याचे क्रियेस धक्का बसतो. याकरितां अशा प्रकारचे गाईचें दूध पिणें वरजावें ह्मणजे सदरील सांगितलेला रोग होणार नाहीं.

## पित्त व डोकें दुखीचा अजार जाण्या करितां उपाय.

पित्त व डोकें दुखीचा अजार जाण्या करितां दुधाच्या तिसऱ्या हिश्याबरोबर चुन्याचें पाणी दुधांत घालून घेतलें असतां जातो. या प्रकारचें मिश्रण रोज घेत गेलें असतां हे अजार मुळींच होत नाहींत.

---

## नवीन चमत्कार.

एका खोलींत कांहीं मंडळींनीं जमून त्यांपैकीं एकास चाहे

र जावयास सांगावें. त्याच्या पश्चात् एखादी वस्तू कोठें तरी लपवून ठेवावी. हें ठिकाण खोलींतील मंडळीस माहीत असतांच त्यांपैकीं दोघांजणानीं त्या मनुष्यास आंत बोलावून त्याच्या दोहीं बाजूस आपण उभे राहून वस्तु लपविलेल्या ठिकाणाकडे एकाग्र चित्त लावावें आणि दोघांनींही हात त्या मनुष्याच्या छातीवर आणि दुसरा पाठीवर याप्रमाणें ठेवावे आणि त्यास ती वस्तू शोधून काढण्यास सांगावें. असें केलें ह्मणजे तो मनुष्य ती वस्तू ठेवलेली असेल तेथें नेमका जातो. या गोष्टीविषयीं सर्वांनीं अनुभव घेऊन पाहावा.

---

## उमेदवार विद्यार्थ्यांचे डोळे खराब न होण्यास उपाय.

हल्लींच्या काळच्या तरुण मनुष्यांच्या डोळ्यांस वाचण्याच्या योगानें त्रास होतो असें पुष्कळांचें ह्मणणें आहे. कित्येकांस तर बारीक अक्षर न वाचण्या विषयीं निश्चय करणें भाग पडतें. डोळे खराब न व्हावे या करितां, पुढील गोष्टी लक्षांत ठेवाव्या असें वैद्य लोकांचें मत आहे. त्या गोष्टी येणें प्रमाणें:—अंधारांतून एकदम उजेडांत येऊं नये; संधी प्रकाशाच्या वेळेस डोळ्यांस त्रास होई अशा वेळीं वाचूं नये आ-

पऱ्या दृष्टीस उजेड पडे अशा ठिकाणीं निजूं नये किंवा दिव्याची ज्योत फार मोठी असतां वाचूं नये.

---

## वाघाचे मिशीचा केंश पोटांत गेल्यास त्यावर उतार.

वाघाचे मिशीचा केंश पोटांत गेल्यास बकऱ्याचे काळजाचे तुकडे करून खावे ह्मणजे उतार पडतो. वाघाचे मिशीचा केंश पोटांत जाणें परम दुर्घट आहे खरें परंतु प्रसंगवशांत अशी गोष्ट घडून आल्यास उपाय माहिती असणें योग्य आहे ह्मणून ह्या ठिकाणीं तो दर्शविला आहे.

---

## सुपारी लागली तर ती उतरण्यास उपाय.

कित्येक मनुष्यांस सुपारी खाण्याचा नाद फार असतो. व सुपारी खाणारास कधीं कधीं सुपारी लागून प्राण कासावीस होण्याचा ही प्रसंग येतो. या करितां सुपारी खाणारानें प्रथम एक दोन वेळ रस थुंकून टाकण्या विषयीं सावधगिरी ठेवावी व मग ती खावी ह्मणजे लागण्याची भिती नसते. या उपर कदाचीत सुपारी लागलीच तर पुढें दर्शविलेले उपाय

करावे ह्मणजे ती उतरेल. गार पाणी प्यावें किंवा साखर तोंडांत धरावी.

---

## उंदीर कमी होण्यास उपाय.

घरांत उंदीर फार होऊन त्यांपासून फार त्रास होत असेल तर खालीं लिहिलेला उपाय करावा ह्मणजे उंदीर कमी होऊन त्रास नाहींसा होईल.

स्पंजाचे बारीक बारीक तुकडे करून ते तुकडे उंदरांच्या खाण्यांत येतील अशा ठिकाणीं टाकून ठेवावे. ते तुकडे उंदरांनी खाल्ले ह्मणजे यांचीं पोटें फुगून ते मरतात. व तेणें करून ते अगदींच कृश होतात. परंतु हा उपाय भूतदया असणारे मनुष्यांचे उपयोगीं पडेल असें आह्मास वाटत नाहीं अशा मनुष्यास त्रासच होणार नाहीं व त्यास उपायाची गरज ही लागणार नाहीं परंतु ज्यास त्रास होणार असेल त्या करितां हा उपाय आहे.

---

## घोड्यांच्या दांतांवरून त्यांचे वयाची परीक्षा करण्याचे प्रकार.

घोड्यांच्या खालच्या दांतांत दोन दाढांच्या मध्यें साहा-

दांत आहेत. ते साहा दांत पांढरे असतील तर तो घोडा ए- क वर्षाचा आहे असें समजावें; काळे तांबडे असतील तर २ वर्षांचा जाणावा (दोन दंतपंक्ती मध्यें सम मध्यभागीं जे दोन दांत ते संदंश, संदंशाच्या दोन बाजूंस २ मध्यम, म- ध्यमांच्या बाजूंस २ अंत्य) संदंश पडून दुसरे आले असले तर तो ३ वर्षांचा, मध्यम पडून दुसरे आले असले तर ४ वर्षांचा, अंत्य पडून नवे आले असले तर ५ वर्षांचा जाणावा, संदंश काळे असतील तर ६ वर्षांचा, मध्यम काळे असतील तर ७ वर्षांचा, अंत्य काळे असतील तर ८ वर्षांचा, संदंश पिंवळे असले तर ९ वर्षांचा, मध्यम पिंवळे असतील तर १० वर्षांचे वयाचा, अंत्य पिंवळे असतील तर ११, संदंश पांढरे असतील तर १२, मध्यम पांढरे असतील तर १३, अंत्य पांढरे १४, संदंश कांचवर्ण असले तर १५ वर्षांचा, मध्य- म कांचवर्ण असले तर १६ वर्षांचा, अंत्य कांचवर्ण असले तर १७ वर्षांचा, संदंश मधा सारिखे असले तर १८ वर्षां- चा, मध्यम मधासारिखे असले तर १९, अंत्य मधासारिखे अ सले तर २०, संदंश शंखा सारिखे अकाराचे असले तर २१ वर्षांचा, मध्यम शंखा सारिखे असले तर २२ वर्षांचा, अंत्य शंखाकृति असले तर घोडा २३ वर्षांचा आहे असें जाणावें,

संदंश सच्छिद्र असले तर २४, मध्यम सच्छिद्र असले तर २५, अंत्य सच्छिद्र असले तर २६, संदंश दांत हालत असले तर २७, मध्यम हालत असले तर २८, अंत्य हलत असले तर २९, संदंश पडले असले तर ३०, मध्यम पडले असले तर ३१, अंत्य पडले असले तर ३२, याप्रकारें एका पासून ३२ पर्यंत घोड्यांच्या वयाचीं वर्षें दांतावरून जाणावीं

---

## कानांतून पू जातो तो न जाण्यास उपाय

हारताळ एक मासा, दीडपावशेर शेळीचे मुतांत कढवून चार पैसे भार उरवावा. त्याचे थेंब फुटलेले कानांत घालीत गेलें असतां पू वहाणें बंद होऊन कान बरा होतो.

---

## नाकांतून रक्त पडतें तें बंदहोण्यास उपाय.

ज्याची प्रकृति उष्ण आहे त्याचे नाकांतून हरहमेष रक्त वाहतें तें बंद करण्या कारितां पुढील सुलभ उपायांची योजना करावी. अवळकटी, गाईचे दुधांत तळून वाटावी, व त्याची वडी टाळूवर घालीत जावी म्हणजे रक्त पडणें बंद होईल. किंवा डाळिंबीचे फुलाचा अगर अम्रबिजाचा रस नाकांत घालीत गेलें असतां ही रक्त वहाणें बंद होईल.